बीड व नांदेड येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या (प्रत्येकी २६ पदे) अशा एकूण ५२ अस्थाई पदे पुढे चालु ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.१९२/आरोग्य-४

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते. रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: २६ जुलै, २०१८.

वाचा

१) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः डिएचसी/३०१०/प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दि.२.०२.२०११.
२) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१७/प्र.क्र.९७/आरोग्य-४, दि.१६.०२.२०१८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०५.०३.२०१८.
४) उपसंचालक, (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रृषा/कक्ष-९/टे-४/ जीएनएमबीड/अपदे/१७४६-४७/१८, दि.२९.०५.२०१८
५) उपसंचालक, (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रृषा/कक्ष-९/टे-४/जीएनएमनांदेड उस्मानाबाद/अपदे/१६८५-८५/१८, दि.२१.०५.२०१८

शासन निर्णय

बीड व नांदेड येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलसाठी (प्रत्येकी २६ पदे) अशी एकूण ५२ पदे निर्माण करण्यास उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर ५२ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.१६.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०१.२०१८ ते दि.२८.०२.२०१८ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

बीड व नांदेड येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुल (प्रत्येकी २६ पदे)

| अ. क्र. | पदनाम | संवर्ग | वेतनश्रेणी | पदनिर्मितीचा शासन निर्णय | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | शासन निर्णय, सा.आ.वि. क्र डीएचसी-३०१०/प्र.क्र.१८८/ आरोग्य-३, दिनांक २.०२.२०११ | २ |
| २ | उपप्राचार्य | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | | २ |
| ३ | पाठ्यनिर्देशक | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | | २८ |
| ४ | लघुटंकलेखक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२४००) | | २ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२४००) | | २ |
| ६ | ग्रंथपाल | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२८००) | | २ |
| ७ | प्रयोगशाळा सहाय्यक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२०००) | | २ |
| ८ | वॉर्डन | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२८००) | | ६ |
| ९ | शिपाई | वर्ग-४ | ४४४०-७४४०(१३००) | | ६ |
| एकूण पदे | | | | | ५२ |

२. बीड व नांदेड येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलसाठी (प्रत्येकी २६ पदे) अशा एकूण ५२ अस्थाई पदांना खालील अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०५.०३.२०१८ नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

सदर पदांवरील होणारा खर्च, मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षिक योजनातंर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०६) (०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)" व , मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष "२२११-कुटूंब कल्याण, ००३-प्रशिक्षण, (०१)-कुटूंब कल्याण प्रशिक्षण-१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१)(०२)-सहायक परिचारिका प्रसाविका, दाई व आरोग्य प्रचारक या निमवैद्यकीय कर्मचा-यांचे प्रशिक्षण (२२११ ०१११)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०५.०३.२०१८ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२०९५२३३८६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.07.26 16:34:03 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कु.क., मा.बा.सं. व शा.आ.), पुणे

३. उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रुषा), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा (/लातूर/नाशिक मंडळ).
५. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड/नांदेड
७. प्राचार्य, जी.एन.एम. नर्सिंग स्कूल बीड, नांदेड, यांना उपसंचालक, आरोग्य सेवा यांचेमार्फत
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड/नांदेड
९. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).